नवनाथ भक्तिसार    अध्याय अठ्ठाविसावा

विक्रम हा गंधर्वपुत्र तर भर्तरी हा साक्षात सूर्यपुत्र! त्या व्यतिरिक्त तो नवनारायणांपैकी द्रुमिलनारायणाचा अवतार. ह्या दोघांची स्नेहवृद्धी आणि एकत्र येणे हे विधिलिखितच होते. विक्रम अवंतिका नगरीच्या महाराजांचा एक राजसेवक पण प्रथम अवंतिकेच्या राजेपदाची माला गजराजाने विक्रमच्या गळयात घातली त्यामुळे तो राजाही झाला आणि शुभविक्रम महाराजांचा जावईही झाला. भर्तरीसह राज्यकारभाराची धुरा हाकत असतांना राज्याचे महामंत्री सुमती यांनी आपली कन्या त्यांस अर्पण करून जामात केले. तत्पूर्वी विक्रमाने त्याची युवराज म्हणून नियुक्ती केली होती आणि सुखेनैव भर्तरी; राजयोगामुळे प्राप्त झालेले वैभव, सुखोपभोगांचा आस्वाद घेत होता पण एके दिवशी सूर्यनारायणांनीच त्यांच्या या विषयोपभोगाविषयी खंत व्यक्त केली आणि श्रीदत्तात्रेयांना विनंती केली की माझ्या अगस्ती पुत्राप्रमाणे यानेही अध्यात्मात प्रगती मिळवावी आणि त्या खास कामासाठीच याच्या भूलोकीच्या अवताराचे प्रयोजन आहे. तेव्हा येन केन प्रकारे त्यास अनुग्रह देऊन त्याची या अशाश्वत सुखोपभोगापासून मुक्तता करा आणि त्यांस चिरंजीवीत्व द्यावे. श्रीदत्तात्रेयांनी त्यासाठी केलेले प्रयत्न कामी आले. बारा वर्षांचा अवधी भर्तरीने श्रीदत्तगुरूंकडून मागितला आणि त्यानंतर सर्वस्वाचा त्याग करून संन्यास घेण्याचे मान्य केले. आता या पुढील कथासार...

मृगयेसाठी घनघोर वनात आपल्या सेनेसह गेलेला भर्तरी कटु अनुभव घेऊन परतला. साक्षात श्रीदत्तगुरूंच्या आशीर्वादाने आणि त्यांनी करवून घेतलेल्या संकल्पानंतर तो राजनागरीत परतला. अवंतिका युवराज भर्तरी पट्टराणीच्या; पिंगलेच्या महालात आला. पुष्पमालांची आरास आणि सुगंधी पुष्पांची शय्या यांनी सुवर्णजडित भव्य मंचक सजविला आहे. लाडक्या पट्टराणीने पतीला आर्जवपूर्वक मंचकावर बसविले. षोडशोपचारे पूजन करून वंदन केले. श्रद्धेने पायधूळ मस्तकी धारण केली. प्रेमालाप करीत भर्तरीने तिला डाव्या मांडीवर बसविले. प्रेमभराने अलींघन देत तिच्या गालाचा मुका घेतला आणि म्हणाला, “पिंगला माझ्या सर्व राण्यांत तू माझी अतिशय लाडकी आहेस. जशी सूर्याची प्रभा आणि सूर्य वेगळे नसतात, तसे देह दोन असले तरी प्राण एकाच आहे. आकाशातील चंद्र प्रकाशमान दिसत असला तरी ते चांदणे म्हणजे सूर्य प्रकाशाचेच प्रतिबिंब असते. तसे तू आणि मी आपण एकमेकांचा प्रतिमा आहोत. ‘पिंगला भर्तरी’ हे दोन देहांची एकरूपता प्रतिबिंबीत करणारे एक नाव आहे. जसे साखर म्हटले की गोडवा, सागर म्हटले की लहरी, तसे पिंगला आणि भर्तरी अविभक्त आहेत. त्यांना विभक्त आस्तित्व नाही.” अशी कुजबुज करीत दोघेही एकेमेकांच्या मिठीत विसावले. एकरूप झाले. प्रणयसुखाचा अत्युच्च आनंद उपभोगुन गुजगोष्टी करीत असताना पिंगलेने भर्तरीला त्रयोदशगुणी विडा दिला आणि प्रेमावेगात बिलगत म्हणाली, “माझ्या हृदयमंदिरातील प्राणप्रियेश्वरा! मी चकोर असेन तर तु माझा चंद्रमा आहेस. प्राणनाथा! दैवयोगाने आणि ईश्वरकृपेने आपल्या गाठी बांधल्या गेल्या आणि आपण एक होऊन गेलो. नदी सागराला मिळाल्यानंतर सागरच होऊन जाते, तसे माझे होऊन, पिंगला भर्तरीत लुप्त झाली आहे. लंकापती रावणाची मंदोदरी, प्रभूरामचंद्राची सीता, श्रीकृष्णाची राधा तशी भर्तरीची पिंगला. मृत्युशिवाय आपली ताटातूट कुणीही करू शकणार नाही. तुमच्या अगोदर मला मृत्यु यावा हीच माझी प्रभूचरणी प्रार्थना आहे. सौभाग्य टिळा कपाळावर असताना मरण येणे ही श्रेष्ठ गती आहे. असे घडले तर मी स्वतःला भाग्यशाली समजेन.

तिने पुढे काही अभद्र बोलू नये म्हणून भर्तरीने तिच्या तोंडावर हात ठेवला आणि म्हणाला, “प्राणेश्वरी, असे बोलू नकोस. ईश्वराची अगम्य लीला आपल्याला कशी समजणार? त्याच्या मनात असेल तेच घडेल. कदाचित तुझ्या अगोदर

यमराज माझे प्राण हरण करील. काळाने मलाच प्रथम नेले तर तू तरी काय करशील? पिंगला उत्तर देताना म्हणाली, “विधात्याने प्रारब्धात काय लिहिले आहे ते कळत नाही पण आपण म्हणता तसे घडल्यास मी क्षणभर ही मागे राहणार नाही. स्वतःला अग्नी समर्पित करून तुमच्याबरोबर येईन.”

“अगं, सर्वच असे म्हणतात पण ते केवळ बोलण्यापुरतेच असते. मानवाला स्वतःचा प्राण प्रिय असतो. माझ्या मनाला समाधान वाटावे म्हणून हे लटके बोल आहेत. कृती करावयाची वेळ आली की पाऊल पुढे जात नाही, याचा मला अनेक वेळा अनुभव आला आहे. राजवाड्यातील सेवक आणि सैनिक नेहमीच म्हणत असतात, ‘आम्ही महाराजांसाठी रणांगणात प्राण ओवाळून टाकू, बलिदान करू.’ परंतु वेळ आली की सैरावैरा पळतात प्राणभयाने श्वान पायांत शेपूट घालते, पाल पाहताच विंचू नांगी टाकून पळतो. शूरवीराचे सोंग आणणारा बहुरूपी रणांगणात पळपुटा ठरतो. त्याचप्रमणे तुझे आहे, बोलण्याप्रमाणे कृती करणे सोपे नाही, जाऊ दे तो अप्रिय आणि वादाचा विषय!”

“स्वामी! आपल्या नावाचे हे मंगळसूत्र ईश्वर साक्षीने मी गळयात बांधले, त्याच वेळी काया, वाचा, मन आपल्या चरणी वाहिले आहे. त्या सर्वव्यापी ईश्वराला साक्ष ठेवून सांगते की या देहाला ‘विधवा’ या शब्दाचा स्पर्श होऊ देणार नाही. बीजाची पेरणी केल्यावर रोप उगवते, हे निसर्गसत्य आहे, तशी वेळ आल्यावर माझ्या वचनाची सत्यता प्रचीतीस येईल. यापेक्षा अधिक काय सांगावे?” असे बोलून पिंगला गप्प झाली पण युवराज भर्तरीच्या मनात ते शब्द घर करून राहिले. कधीतरी या शब्दांची प्रचीती पाहण्याचा निश्चय करून त्याने तो विषय आणि चर्चा तिथेच संपवली. त्यानंतर अनेक दिवस उलटून गेले. एकदा शिकारीसाठी भर्तरी अरण्यात गेला असताना त्याला पिंगलेची आणि तिने केलेल्या विधानांची आठवण झाली. त्या वचनाची सत्यता पाहण्याच्या हेतूने त्याने मनाशी एक योजना आखली. शिकारीसाठी जंगल भ्रमण करीत असताना त्याला अकस्मात एक हरीण दिसले. सर्वांनी पाठलाग करून त्याला जिवंतावस्थेत पकडले. युवराज भर्तरीने मुकुटासह वस्त्रभूषणे काढून हातात घेतली. हरणीची हत्या करून त्याच्या रक्तात ती सर्व भिजवली आणि एका सेवकाच्या हातात दिले आणि दुसरी वस्त्रे परिधान करून झाडाखाली विश्रांतीसाठी पहुडला सेवक मंडळी आपल्या मुगदुराप्रमाणे दूरवर बसली होती. ज्या सेवकाकडे हरीणाच्या रक्ताने भिजवलेली वस्त्रे दिली होती. त्याला स्वतःकडे बोलवून म्हणाला, “विश्वासू सेवका! ही रक्ताने भिजलेली वस्त्रे घेऊन पिंगलाकडे आणि वस्त्रे तिच्यापुढे ठेवून सांग की ‘राजांचा घात झाला.’ तिने जर विचारले, ‘कसा?’ तर सांग की, ‘वाघाची शिकार करीत असताना वाघाने प्रतिहल्ला करून राजांचा प्राण घेतला. महाराज आपणा सर्वांना सोडून गेले.” अशा प्रकारे त्या सेवकाला पढवून, गुप्ततेची शपथ घालून त्याला राजवाड्याकडे पाठविले.

राजवाड्यामध्ये जाऊन सेवक पिंगला समोर मुजरा करून उभा राहिला. रक्ताने डागाळलेली वस्त्रभूषणे आणि मुकुट ठेवून म्हणाला, “महाराणी स्वामिनी! घात झाला आहे. महाराज शिकार करीत असताना, अचानक जाळीतुव वाघ आल्याचे त्यांच्या लक्षात आले नाही. त्याने मागून हल्ला करून राजाला ठार मारले आणि त्यांचे रक्त पिऊन पळून गेला. आता त्यांच्या प्रेताचे दहन करून बाकीचे लोक येतीलच.” हे ऐकून पिंगला दुःखावेगाने धरणीवर कोसळली. ऊर पिटीत आक्रोश करू लागली. स्वतःचे कपाळ धरणीवर आपटीत केस उपटू लागली. तिच्या शोकाला पारावर राहिला नाही. हंबरडे फोडत स्वतःला क्लेश करून घेऊ लागली. “प्राणनाथ! मला टाकून आपण एकटेच परलोकी कसे निघून गेलात? तुमचा प्रीतीचा झरा कसा आटला? अहो प्राणनाथ!! माझ्याशिवाय तुम्हाला क्षणभरही करमत नव्हते ना? मग

आज परदेशी रमलात कसे? असा हृदय विदीर्ण करणारा आक्रोश ऐकून युवराजांच्या निधनाचे वृत्त सर्वत्र राजमहालात पसरले आणि भर्तरीच्या बाराशे राण्यांनी एकच आकांत मांडला, एकमेकींची गळा फाडून रडारड सुरु झाली. कुणीएक कपाळ बडवून घेत होते, तर दुसरी धरणीवर गडबडा लोळून हंबरडे फोडत होती. कुणाची दातखीळी बसली. कुणाला मूर्च्छा आली. कुणी स्वतःच्या मुखात माती घालून आक्रोश करू लागली. कुणी रडत ओरडत देवाला जाब विचारू लागली. "हे परमेश्वरा! आम्हा सर्व स्त्रियांना दीनवाणे करून आमच्या सुखाचा ठेवा का हिरावून घेतलास?" पट्टराणी सावरली नाही. दुःखाने कळवळत म्हणाली, "महाराज! अपार ममता आणि अतूट प्रीती तोडून कसे गेलात? असे निष्ठुर का झालात? राजसभेत असताना माझी आठवण होताक्षणी मला भेटून जात होतात! आता सगळा राज्यकारभारच सोडून गेलात? मला पहिल्याशिवाय तुम्हाला चैन तरी कशी पडेल? माझी प्रेमळ पक्षिणी मला सोडून गेली? रानात चारावयास गेलेली माझी हरिणी, पाडसाला सोडून कुठे गेली? माझ्या नेत्रज्योतीच गेल्या. माझी अंधाराची काठी कुठे गेली. माझ्या मुखातील घास काळ नामक भिकाऱ्याने हिरावून घेतला! नाथा ऽ ऽ ! असे निष्ठुर का झालात? कोणताही सुग्रास पदार्थ माझ्या मुखात घातल्याशिवाय आपण कधी भक्षण केले नाही; आपली अलौकिक प्रीत भंग करून का गेलात? नाथ ऽ ऽ मला बरोबर का नाही नेले? असे अद्भुत कोलाहलाचे वादळ शमत नव्हते.

शोकाकुल पिंगलाने सती जाण्याच्या निश्चय केला आणि सेवकांना स्मशानात चिता रचण्याचा हुकुम केला. भरगच्च केशसांभारावर पतीचा शिरेमुकुट परिधान केला. पतीचा रक्ताळलेली वस्त्रे परिधान केली. सतीचे वाण घेऊन स्मशानाकडे निघाली. अत्यंत शोकमग्न आणि भग्न मनःस्थितीत ती स्मशानात पोहोचली. चिता पेटवली गेली, अग्नीच्या ज्वाळा धडाडून उसळल्या. सौदामिनीप्रमाणे प्रखर निश्चयाने तेजस्वी भासणाऱ्या पिंगलेने सर्वांना हात जोडून अखेरचा नमस्कार केला आणि निर्धाराने, "जय जय भर्तरी! तुझा देह तुलाच समर्पित करीत आहे. स्वीकार कर नाथ!!" असे म्हणून स्वतःला अग्नीत झोकून दिले. त्या धडाडणाऱ्या ज्वालांनी तिला आपल्या कवेत घेतले. लालबुंद अग्नीमध्ये अदृश्य होऊन पिंगला पंचतत्वात विलिन झाली. तिथे उपस्थित लोक सुन्न झाले होऊन म्हणाले, "धन्य धन्य ती पिंगला! पतीबरोबर सहगमन करून तिने जन्माचे सार्थक केले. स्वतःचा उद्धाराच करून घेतला. अशी पतिव्रता सासर आणि माहेरच्या कुळाचाही उद्धार करणारी साध्वी असते." दुःखाश्रुंचे सिंचन करून त्यांनी पिंगलेला भावपूर्ण निरोप दिला. लोक स्मशानातून परतले. राजवाड्यामध्ये उर्वरित सर्व स्त्रियांचा अपार शोक सुरू होताच, त्यांत पिंगलेच्या सहगमनाने त्या शोकाची तीव्रता वाढली.

त्या दिवशी घडलेल्या घटनांचा साक्षीदार सूर्यनारायण अस्तास गेला. अरण्यातून भर्तरी अवंतिकानगरीकडे निघाला. अंधारामुळे मशाली पेटवून त्या प्रकाशात वाटचाल सुरु आहे. वाऱ्याने फडफडणाऱ्या मशालींचा क्षणभर अंधार आणि दुसऱ्याक्षणी प्रकाश असा उघड्झापीच्या खेळात त्याचे विचारचक्रही भिरभिर फिरत आहे. "सेवकाला राजवाड्यावर पाठविला होता. अद्याप तो परतला नाही. काय घडले आहे याचा अंदाज येत नाहीये. स्त्रियांची प्रगल्भता तशी कमीच असते. मी पण अति शहाण्यासारखा वागलो. आता दुसऱ्या कोणाला तरी पाठवून काय घडले याचा शोध घेतला पाहिजे. फारच चुकीचा वागलोय मी. काही तरी अशुभ घडले असावे असे मला का वाटते आहे? दुर्बुद्धीने पदरी मुर्खपणा ओढवून घेतला आहे..." असा विचार करीत काळजीने त्रस्त झालेला भर्तरी म्लान चेहरा करून चालत आहे. वास्तविक तो विश्वासू सेवक अरण्यात परतला होता पण चुकामुक झाल्याने त्या दोघांची भेट झाली नाही. तसेच योगायोगाने त्या दिवशीच विक्रम राजा सुद्धा शुभविक्रम, महामंत्री सुमती आणि अन्य मंत्रीगणाबरोबर मथुरेला सत्यवर्माच्या भेटीसाठी

गेला असल्याने, अवंतिकेत केवळ महिलावर्गाची उपस्थिती होती. सारासार विवेकबुद्धीने निर्णय घेणारे कुणी नव्हते. अशा प्रकारे सर्व दुर्भाग्य योग जुळून आले त्यात पिंगलेची आहुती पडली.

त्या रात्री उशिरा भर्तरी साथीदारांसह नगरीच्या महाद्वारावर पोहोचला. समोर महाराजांना पाहून द्वारपाल आश्चर्याने थरारलाच. घाईगडबडीने मुजरा करून म्हणाला, “महाराज! अरण्यातून आपला एक सेवक अशुभ बातमी कळवून गेला आहे. त्यामुळे सारी नगरी शोकसागरात बुडाली आहे. त्या शोकाच्या आगीने महाराणी पिंगलेचा घास घेतला आहे. आपण मृत झाल्याचे समजून त्या सती गेल्या. काही वेळापूर्वीच पिंगला राणीच्या सतीगमनासाठी स्मशानात गेलेली सर्व मंडळी क्रिया कर्म संपवून परतली आहेत.”

अगोदरच अशुभ विचारांनी ग्रासलेला युवराज भर्तरीच्या मनावर जोरदार आघात झाला. घोड्यावरून उडी मारून तो उतरला आणि रडत ओरडत स्मशानाकडे पळत सुटला. त्याच्या मागोमाग सहकारी आणि राजसेवकही धावू लागले. स्मशानात पिंगलेची जळत असलेली चिता पाहून त्यांत उडी मारणार, तोच सेवकांनी त्यास कवटाळून धरले. विमनस्क्तेमुले भ्रमिष्ट झालेला भर्तरी त्यांच्या विळख्यातून निसटण्याची धडपड करू लागला परंतु अनेकजणांनी घट्ट धरून ठेवल्यामुळे त्याचा नाईलाज झाला. गलितगात्र होऊन भुईवर बसला. अफाट शोक करू लागला. उर बडवून घेत जमिनीवर डोके आपटले. डोळे पांढरे होऊन त्याला मूर्च्छा आली. घाबरलेल्या सेवकांनी कसेतरी त्याला शुद्धीवर आणले पण उसळी मारून पुन्हा चितेकडे धावत सुटला, सेवकांनी त्याला पुन्हा पकडून बळाने थोपविले. तेव्हा दारूण दुःखात तो बरळू लागला, “पिंगला!! मला इथे ठेवून तू एकटीच माझ्याआधी परलोकात का गेलीस? माझ्यासाठी बेचैन होणारी, आज कशी निष्ठुर झालीस? पिंगले, पिंगले ऽ ऽ मी तुझा पती नसून तुझा काळ ठरलोय! मूढमतीने मीच तुला भस्म केले. मी पती नसून पतित आहे. दुष्ट, दुर्जन असून तुझा वैरी झालो ग!... माझ्या पिंगले, एकदाच मला दर्शन दे...” मस्तक धरणीवर आपटीत, दणादाण हृदयावर दणके मारत त्याने पुन्हा हंबरडा फोडला.

“प्रये पिंगले! तुझ्या हृदय मंदिरातला मी देव होतो. आता मी कोणत्या मंदिरात वास करू? तुझ्याविना दशदिशा सुन्या झाल्या आहेत. माझ्याच कुडीतला प्राण गेलां. मी तर जिवंत प्रेत उरलो गं!! पिंगले, आता मला सुख, शांती, चैन, निद्रा कशी येईल? माझी तहान भूक, माझ्या मनाचा हळुवारपणा कोण संभाळणार? तुझे उर्वशी समान गोड रूप, अमृतासम मधुर भाष्य, मोरपिसासारख्या मृदू मुलायम प्रीतीने मी वेडावून जात होतो. पिंगले; मी तुझ्याभोवती भ्रमरासारखा गुंजारव करीत पिंगा घालीत असायचा. आता तुला कुठे शोधू? पिंगले!! तू दयेची, मायेची मूर्ती होतीस. धर्मपालन करणारी देवी होतीस. तू सद्गुणाचे भांडार होतीस. माझी जीवनसाथी पिंगले, असा कसा अर्ध्यावर डाव उधळून गेलीस?” भर्तरी युवराजचा तो शोक, गहिवर आक्रोश आणि देहाची करीत असलेली आदळआपट, हालापेष्टा पाहून उपस्थित सहकारी उद्विग्न झाले, गलबलून रडू लागले.

युवराज भर्तरी जिवंत असून अरण्यातून परतला असल्याची बातमी हा हा म्हणता सर्व नगरीभर पसरली, नगरजनांच्या एका डोळ्यांत दुःखाचे तर दुसऱ्या डोळ्यांत सुखाचे आश्रू वाहत होते. सुखदुःखाचे अजब मिश्रण एकाच वेळी झाले. पक्षांचा थवा झाडावर उतरावा त्याप्रमाणे नागरिक भराभर स्मशानात गोळा झाले. भर्तरीचा विलाप पाहून ते सुद्धा शोकाकुल झाले. मायेच्या वेगवान प्रवाहाच्या भोवऱ्यात सार्वजण गटांगळ्या खाऊ लागले. त्या आकांताचे वर्णन करणे केवळ अशक्य आहे. काही वयस्क आणि ज्येष्ठ नागरिक युवराज भर्तरीला समजावीत म्हणाले, “युवराज! किती शोक

कराल? घडणारी घटना घडून गेली. ती ईश्वरी इच्छा होती असे समजावे आपणा सर्वांनाही त्याच वाटेने जावयाचे आहे. आत्मा शाश्वत आहे आणि देह हे त्याचे निवास्थान नश्वर असल्याचे आपल्यासारख्या सुज्ञास सांगण्याची खरं तर गरज नाहीये. अशाश्वताच्या मोहात पडून किती क्लेश करून घेणार आहात? आपले हजारो पूर्वज गेले आहेत. पिंगला गेली, आपणही जाणार आहोत आणि भविष्यातील आपले वंशजही जाणार आहेत, कुणीही राहणार नाही. जे जे अशाश्वत आहे त्याचा लय अटळ असतो, हे ज्ञानवंताना माहित असते. तरही आपण त्यासाठी अपार शोक करून जीवाला व्यर्थ कष्ट देताय, हे गैर आहे. जपी, तपी, सिद्ध साधक यांचीही मृत्युपासून सुटका झाली नाही. आता यापुढे जाणारा प्रत्येक क्षण सुखाचा मानवा. ईश्वराचा जप मुखाने आणि त्याचे चिंतन मनाने असावे." आपापल्या परीने जो तो युवराजाचे सांत्वन करण्याचे प्रयत्न करून थकले आणि एका मागोमाग एक असे निघून गेले कारण त्या सांत्वनाचा किंवा उपदेशाचा युवराज भर्तरीवर काहीही परिणाम होत नव्हता, की त्याचा शोकही थांबत नव्हता. मध्यरात्र उलटून गेली.

दुसऱ्या दिवसाचा सूर्योदय झाला. पिंगलेचा घास घेऊन अग्निही अदृश्य झाला. चिता शांत झाली. दुसरा दिवस समजून अस्थी गोळा करण्यासाठी आप्तजन स्मशानात आले. भर्तरी रात्रभर तिथेच होता हे दिसून आले. भकास चेहरा, शून्याकडे दृष्टी अशी विमनस्क अवस्था पण अस्थी गोळा करण्यासाठी आलेल्यांना तो प्रतिबंध करू लागला. कुणालाही हात लावू देईना, हताश होऊन ते परत गेले. अन्नपाणी न घेता भर्तरी चिते जवळच बसून 'पिंगला, पिंगला' असे म्हणत आक्रंदन करीत आहे. पिंगलेचे सती जाणे, भर्तरीचा स्मशानवास आणि राजवाड्यातील शोकग्रस्त स्त्रियांचा कल्लोळ याची सविस्तर माहिती दूताकरवी मथुरेत विक्रम राजास कळताच तो सत्यवर्मा, शुभविक्रम आणि महामंत्री सुमती यांच्यासह सर्वांना घेऊन अवंतिका नगरीत तातडीने आला. सर्वजण प्रथम स्मशानात आले. सारं काही अनपेक्षित आणि अकल्पितपणे घडले. महामंत्री सुमती आपल्या मुलीचे गुण आठवून रडू लागला. विक्रम राजाचाही शोक अनावर झाला. "आमच्या घरातील मौल्यवान रत्ने काळरुपी तस्कराने नेली. तेजस्वी ज्योतीवरच काळाने झडप घातली. उभय कुळातील सर्वार्थाने रूपवंत, गुणवंत, ज्ञानवंत अशी पवित्र ज्योत अनंतात विलिन झाली. शोक आवरून विक्रमराजा भर्तरीची समजूत घालीत होता. नानाप्रकारे उपदेश करून राजवाड्यावर चालण्याची विनंती करीत होता. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. त्याच्या जाणीवा नष्ट झाल्या होत्या. पण 'पिंगला पिंगला!' अशा आर्त हाका मारीत होता. कोणताही बोध वा विनवणी त्याच्यापुढे निष्काम ठरली. असे दहा दिवस गेले. विक्रम रोज स्मशानात येऊन त्याची भेट घेई आणि पुन्हा पुन्हा राजवाड्यात चालण्याचा आग्रह करी पण भर्तरी बधत नसे. शेवटी विक्रमानेच उत्तरक्रिया कर्म करून सुतकविधी आटोपून शुचिर्भूत झाला. तेराव्या दिवशी दानधर्म करून जातीभोजन घातले आणि कर्तव्यभावाने राज्यकारभाराचे कामकाज करू लागला.

भर्तरी मात्र विरह वेदनेने तडफडत स्मशानातच बसून आहे. तहत बारा वर्षांचा कालावधी संपला तरीही भर्तरीला काही पिंगलेचा विसर पडला नाही. झाडाची पाने आणि गवत हाच त्याचा आहार! अन्न वर्ज्य केले होते. शरीर कृश झाले, प्राण कंठाशी आले होते, हाडांचा सापळा भासत होता. तरी मुखाने पिंगला आणि ईश्वराचे नाव आशी बारा वर्षे पार पडली म्हणजे तपश्चर्याच झाली. काया पवित्र झाली. भर्तरीच्या जीवनाची ही शोकांतिका आणि त्याची झालेली दशा दशा पाहून सूर्यनारायणांना त्याच्याविषयी कणव निर्माण झाली. पुत्र वात्सल्याने हळवे झाल्यामुळे ते श्री दत्तात्रेयांकडे गेले. त्यांचे स्वागत करून श्रीदत्तगुरूंनी विचारले, "मित्रा! आज येणे कसे झाले?" त्यावर सूर्यदेव म्हणाले, "दत्तात्रेया!

आपण तर सर्वज्ञानी आहात? तुम्ही तर जाणतही असाल, तुमचा शिष्य भर्तरीची काय अवस्था झाली आहे ती! जरा पहावी आणि त्याच्यावर कृपा करावी. त्याचे हित करा आणि त्यास सन्मार्गाला लावावे."

श्रीदत्तगुरूंनी दिव्य दृष्टीने भर्तरीची अवस्था पाहिली आणि ते कळवळले. दयाघन दत्तगुरु सूर्यदेवाला म्हणाले, "भानुराज! आपण चिंता करू नका. माझा शिष्य मच्छिंद्रनाथ आणि त्याचा शिष्य गोरक्षनाथ तीर्थयात्रा करीत आहेत. भ्रमंती करीत तो माझ्या दर्शनासाठी येथे येईल. तो महा तपस्वी असून त्याला मी भर्तरी कडे पाठवीन. तो युक्तीप्रयुक्तीने भर्तरीला योग्य मार्गावर आणून माझ्याजवळ घेऊन येईल." संतुष्ट झालेल्या सूर्यदेवांनी श्रीदत्तांचा निरोप घेतला व स्वकार्यासाठी निघून गेले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने विवाह होत नसल्यास तो होऊन गुणी पत्नी लाभेल.